सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाचा प्रधानमंत्री मातृवंदना योजना या केंद्र पुरस्कृत योजनेचा प्रशासकीय खर्चासाठी केंद्र व राज्य हिश्याचा (६०: ४०) निधी वितरित करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रमाव -२०२०/२२८/प्र.क्र.९९/कु.क.

१० वा मजला, बी विंग, गो.ते.रुग्णालय संकुल इमारत
नवीन मंत्रालय, लो.टि.मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: ०१ जुलै, २०२०

**वाचा -**

१) केंद्र शासनाच्या महिला आणि बाल विकास मंत्रालयाचे क्रमांकः १५/२८/२०१७- PMMVY, दि.२.३.२०२० चे पत्र
२) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांकः प्रमाव २०२०/२२८/प्र.क्र.९९/कु.क., दि.३१.३.२०२०
३) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांचे जावक क्रमांकः राकुकका/PMMVY/न.क्र. /२१३१४-१६/२०२०, दि. ०४.५.२०२०
४) केंद्र शासनाच्या महिला आणि बाल विकास मंत्रालयाचे क्र.१५/२८/२०१७- PMMVY, दि.१५.५.२०२० चे पत्र.

**प्रस्तावना -**

प्रधानमंत्री मातृवंदना योजनेच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाने सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षासाठी प्रशासकीय खर्चापोटी केंद्र हिश्याचे ६० टक्के प्रमाणे रु.६,२५,२१,२६८/- (रुपये सहा कोटी पंचवीस लक्ष एकवीस हजार दोनशे अडूसष्ट फक्त) एवढे अनुदान राज्यास उपलब्ध करुन दिले आहे. सन २०१९-२०२० च्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून प्रधानमंत्री मातृवंदना योजनेंतर्गत प्रशासकीय खर्चाच्या केंद्र हिश्याच्या ६० टक्के प्रमाणे रु.६,२५,२१,२६८/- व राज्य हिश्याच्या ४० टक्के प्रमाणे रु.४,१६,८०,८४५/- असा एकूण रु.१०,४२,०२,११३/- एवढा निधी वितरणाचा शासन निर्णय दिनांक ३१.०३.२०२० रोजी निर्गमित करण्यात आला होता. मात्र हा निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर प्रत्यक्ष उपलब्ध न झाल्यामुळे सदरचा निधी आहरित करता आला नाही. त्यामुळे सदरचा निधी सन २०२०-२०२१ च्या उपलब्ध अर्थसंकल्पिय तरतुदीमधुन वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तसेच केंद्र हिश्याचा निधी सन २०२०-२०२१ मध्ये खर्च करण्यास केंद्र शासनाने दि. १५.०५.२०२० च्या पत्रान्वये मंजुरी दिलेली आहे. त्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय -

प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेवून वाचा येथील अनु क्र.२ येथील शासन निर्णय रद्द करण्यात येत असून याबाबतचा पुढील प्रमाणे सुधारित आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाचा प्रधानमंत्री मातृवंदना योजनेसाठी प्रशासकिय खर्चासाठी केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला केंद्र हिश्याचा ६० % नुसार रु.६,२५,२१,२६८/- (रुपये सहा कोटी पंचवीस लक्ष एकवीस हजार दोनशे अड्डुसष्ट फक्त) व राज्य हिश्याचा ४० % नुसार रु.४,१६,८०,८४५/- (रुपये चार कोटी सोळा लक्ष ऐंशी हजार आठशे पंचेचाळीस फक्त) असा एकूण रु.१०,४२,०२,११३/- (रुपये दहा कोटी बेचाळीस लक्ष दोन हजार एकशे तेरा फक्त) एवढा निधी सन २०२०-२०२१ या चालू आर्थिक वर्षाच्या उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतुदीतून या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत आहे.

२. प्रधानमंत्री मातृ वंदना या केंद्र पुरस्कृत योजनेचा प्रशासकीय खर्च सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षात विभागाच्या अर्थसंकल्पात मंजूर असलेल्या लेखाशीर्षाखालील तरतूदीतून भागविण्यात यावा.

| अ.क्र. | तपशील | केंद्र/राज्य हिस्सा | | |
|---|---|---|---|---|
| | | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पिय तरतुद | वितरीत करावयाची रक्कम |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मागणी क्र. आर-१, २२११ कुटुंब कल्याण, ००-१०३ माता व बाल आरोग्य, ०२ प्रधानमंत्री सुरक्षित मातृत्व सहयोग कार्यक्रम, (०२) (०४) प्रधानमंत्री मातृवंदना योजना (प्रशासकिय खर्च) (केंद्र पुरस्कृत योजना) (**केंद्र हिस्सा ६०%**) २२११ १४१२, २० इतर प्रशासकिय खर्च | २२११ १४१२ | रु.१७,०१,७०,०००/- | रु.६,२५,२१,२६८/- (६० % केंद्र हिस्सा) |
| २ | मागणी क्र. आर-१, २२११ कुटुंब कल्याण, ००-१०३ माता व बाल आरोग्य, ०२ प्रधानमंत्री सुरक्षित मातृत्व सहयोग कार्यक्रम, (०२) (०५) प्रधानमंत्री मातृवंदना योजना (प्रशासकीय खर्च) (केंद्र पुरस्कृत योजना) (**राज्य हिस्सा ४०%**) २२११ १४२१, २० इतर प्रशासकिय खर्च | २२११ १४२१ | रु. ४,९५,००,०००/- | रु.४,१६,८०,८४५/- (४० % राज्य हिस्सा) |
| **एकूण** | | | | **रु.१०,४२,०२,११३/-** |

३. उपरोक्त निधीसाठी मुख्य प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, माता बाल संगोपन आणि शालेय आरोग्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरित केलेल्या निधीबाबतचे देयक कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबीवर खर्च करण्यासाठी राज्य आरोग्य सोसायटी- PMMVY यांच्याकडे निधी सुपूर्द करण्यात यावा.

५. या शासन निर्णयान्वये योजनेसाठी वितरित केलेल्या निधीतून योजनेच्या प्रशासकीय खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र व योजनेच्या प्रगतीचा अहवाल केंद्र व राज्य शासनास विहित प्रपत्रात केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वेळोवेळी पाठविण्यात यावा. तसेच सदरचा खर्च योजनेच्या प्रशासकीय बाबींवर करण्यात यावा. प्रधानमंत्री मातृ वंदना या केंद्र पुरस्कृत योजनेच्या प्रशासकीय खर्चासाठी प्राप्त झालेल्या अनुदानापेक्षा अधिक खर्च होणार नाही याची संबंधित अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८६/व्यय १३, दि.१५.६.२०२० च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००६२९१७५४४५९९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ujwala Arun Ransing

Digitally signed by Ujwala Arun Ransing
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a7788b3b31e2d9269bcbfd9588a6ee4771341780133d295a56dd4ef476977773, serialNumber=3b8f98f1c182bf458a4deee399a7241b5044aeb09c097bc6d28b58709fe8ef0d, cn=Ujwala Arun Ransing
Date: 2020.07.01 14:56:42 +05'30'

**(उज्वला अ. रणसिंग)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर
२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त आरोग्य सेवा, तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

५. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
६. सह संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
८. मुख्य प्रशासकिय अधिकारी, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
९. वित्त विभाग (व्यय-१३/अर्थसंकल्प-९), मंत्रालय, मुंबई.
१०. सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प/लेखा), मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१२. निवडनस्ती